**कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियानांतर्गत केंद्र शासनाने सन २०१८-१९ साठी पुनर्जीवित करून दिलेल्या अनुसूचित जमाती प्रवर्गासाठीचा केंद्र हिस्साच्या अखर्चित निधीस (₹१८५.१९ लक्ष) शासनाची वित्तीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : रागते -२०१८/प्र.क्र.८० (भाग-२)/४-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०३ ऑक्टोबर, २०१८

**वाचा:-**

१) केंद्र शासनाचे पत्र क्र.F.NO.१/२०१८-१९/NFSM(OS&OP) दि.२ मे, २०१८.
२) कृषि प पदुम विभागाचे शासन निर्णय क्र.अेअेपी-२०१८/प्र.क्र.४६/४अे, दि.१६ मे, २०१८.
३) केंद्र शासनाचे पत्र क्र.१४-१/२०१८-CA-II, दि.२८ मे, २०१८.
४) केंद्र शासनाचे पत्र क्र.१४-२/२०१८/CA-II, दि.०५ जून, २०१८.
५) कृषि प पदुम विभागाचे शासन निर्णय क्र.अेअेपी-२०१८/प्र.क्र.४६/४अे, दि.२० जून, २०१८.
६) कृषी आयुक्तालयाचे पत्र जा. क्र. वि.प्र.२/ रा.अ.सु.अ.(गळीत)१८-१९/पुनर्जि.निधी/प्र.क्र.६/२०१/१८, दि.११ जून, २०१८.
७) आदिवासी विकास विभागाचे शासन निर्णय क्र.बीयुडी-२०१८/प्र.क्र.११/कार्यासन.६, दि.२५ जुलै, २०१८.

**प्रस्तावना :-**

राज्यात तेलबिया व तेलताड ( National Mission on Oilseed and Oil Palm (NMOOP)) या अभियान राबविण्यात येत असून या अभियानाअंतर्गत लघुअभियान- १ (तेलबिया), लघुअभियान -२ (तेलताड) व लघुअभियान -३ (वृक्षआधारित तेलबिया) या तीन लघुअभियानांचा समावेश आहे. या अभियानाच्या निधीत, केंद्र व राज्य हिश्याचे प्रमाणात ६०: ४० असे प्रमाण विहित आहे.

केंद्र शासनाने सदर अभियान सन २०१८-१९ या वर्षात राबविण्यासाठी दि.११ जून, २०१८ च्या पत्रान्वये गतवर्षीच्या प्रलंबित दायीत्वासह रु.७९००.९१ लाख एवढया रकमेच्या कार्यक्रमास सुधारीत प्रशासकीय मान्यता दिलेली आहे. यामध्ये केंद्र हिस्सा रु.४८५६.०० लाख व राज्य हिस्सा रु.३०४४.९१ लाख एवढया रकमेचा समावेश आहे. सदर कार्यक्रमास दि.२० जून, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

केंद्र शासनाने दि.०५ जून, २०१८ च्या पत्रान्वये सन २०१७-१८ मधील अखर्चित निधी रु.२२०.८० लाख सन २०१८-१९ करिता पुर्नजिवित करुन दिला आहे. कृषि आयुक्तालयाच्या दि.११ जून, २०१८ रोजीच्या प्रस्तावानुसार केंद्र शासनाने खालील प्रमाणे प्रवर्गनिहाय पुनर्जिवित केलेल्या निधीस वित्तीय मान्यता प्रदान करण्याचा प्रस्ताव खालील प्रमाणे सादर करण्यात आला आहे:-

**(रु.लाखात)**

| **अ. क्र.** | **प्रवर्ग** | **अभियान क्र.१ (गळीत)** | **अभियान क्र.३ (वृक्षजन्य तेलबिया)** | **एकूण** |
|---|---|---|---|---|
| १ | अनुसूचित जाती | ६.५० | ११.०० | १७.५० |
| **२** | **अनुसूचित जमाती** | **१८१.२१** | **३.९८** | **१८५.१९** |
| ३ | सर्वसाधारण | ३.३४ | १४.७७ | १८.११ |
| | एकुण | १९१.०५ | २९.७५ | २२०.८० |

कृषि आयुक्तालयाच्या दि.११ जून, २०१८ च्या प्रस्तावाच्या अनुषंगाने अनुसूचित जमाती प्रवर्गाचा पुनर्जिवित केलेला निधी वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता, त्याबाबत खालील प्रमाणे निर्णय घेत आहे:-

**शासन निर्णय -**

१. केंद्र पुरस्कृत कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियानांतर्गत ( National Mission on Oil seeds and Oil Palm) अनुसचित जमाती प्रवर्गासाठी सन २०१७-१८ मध्ये प्राप्त झालेला परंतु अखर्चित राहिलेला केंद्र हिस्स्याचा निधी पुर्नजिवित करुन अभियान- १ (तेलबिया) करिता रु.१८१.२१ लक्ष व अभियान-३ करिता रु.३.९८ लक्ष असा एकुण ₹ १८५.१९ लक्ष ( रुपये एक कोटी पंच्याऐंशी लक्ष एकोणीस हजार फक्त) निधी आयुक्त (कृषि) यांना सन २०१८-१९ मध्ये वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेल्या केंद्र हिश्याच्या (६० टक्के) निधीस अनुरूप राज्य हिस्याचा (४० टक्के) जिल्हा नियोजन समितीच्या (DPDC) अखत्यारीतील तरतूदीस संबधीत जिल्हाधिकारी यांचेकडून वित्तीय मान्यता देण्यात यावी. सदर राज्य हिश्याचा खर्च आदिवासी विकास विभाग जिल्हा वार्षिक योजनेच्या लेखाशिर्षांखाली (डि.पी.सी.) चालु वर्षी जिल्हास्तरावर करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीमधून PFMS प्रणालीद्वारे करण्यात यावा.

३. कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान **अभियान-१ (तेलबिया)** करीता उपलब्ध करुन देण्यात आलेल्या केंद्र हिस्याचा **₹ १८१.२१ लाख निधी (रुपये एक कोटी एक्याऐंशी लाख एकवीस हजार फक्त )** आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यात येत असून सदर निधी खालील लेखाशिर्षांतर्गत सन २०१८-१९ करिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतुदीतून जिल्हास्तरावर PFMS प्रणालीद्वारे खर्ची टाकावा-:

**मागणी क्रमांक टी-५**
**२४०१- पीक संवर्धन**
**७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना**
**(००) (१४) कृषि उन्नती योजना-राष्ट्रीय तेलबिया व तेलताड लघु अभियान-१ तेलबिया (के.पु.यो.) (केंद्र हिस्सा) (६०% ) (आक्षेउयो)**
**(२४०१ A४८६) ३३, अर्थसहाय्य**

४. कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान **अभियान-३ (वृक्षजन्य तेलबिया)** करीता उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीपैकी केंद्र हिस्याचा **₹ ३.९८ लाख निधी (रुपये तीन लाख अठ्ठयाण्णव हजार फक्त)** आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यात येत असून सदर निधी खालील लेखाशिर्षांतर्गत सन २०१८-१९ करिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतुदीतून जिल्हास्तरावर PFMS प्रणालीद्वारे खर्ची टाकावा-:

**मागणी क्रमांक टी-५**
**२४०१- पीक संवर्धन**
**७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना**
**(०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना**
**(१६) कृषि उन्नती योजना-राष्ट्रीय तेलबिया व तेलताड लघु अभियान-३)**
**वृक्ष आधारीत तेलबिया) (के.पु.यो.)**
**(केंद्र हिस्सा ) (६०% ) (आक्षेउयो)**
**(२४०१ A५०१) ३३, अर्थसहाय्य**

५. सदर निधी खर्च करताना संदर्भाधीन अ.क्र.२ येथील दि. १६ मे, २०१८ च्या शासन निर्णयातील अटी, शर्ती व कार्यपद्धतीचे पालन करण्यात यावे.

६. सदर निधी सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात खर्च होईल, याची दक्षता घ्यावी.

७. या शासन निर्णयान्वे उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने आयुक्त (कृषि) यांनी वेळोवेळी उपयोगीता प्रमाणपत्र केंद्र शासनास सादर करावे व त्याची एक प्रत राज्य शासनास पाठवावी.

८. सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१८५/२०१८/व्यय -१, दि.१०/०९/२०१८अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचे सांकेतांक २०१८१००३१७०९४८२४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: CN = Shrikant Chandrakant Andge, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Agriculture And ADF Department
Date: 2018.10.03 17:18:19 +05'30'

**(श्रीकांत आंडगे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
२) मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
३) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानमंडळ, मुंबई.

४) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई.
५) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
६) संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे
७) संचालक ( फलोत्पादन ), कृषि आयुक्तालय, पुणे
८) सर्व संचालक / सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
९) सर्व विभागीय आयुक्त
१०) सर्व जिल्हाधिकारी,
११) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१२) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१३) सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी
१४) सर्व कृषी विकास अधिकारी, जिल्हा परिषद
१५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१६) सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद
१७) व्यवस्थापकीय संचालक, कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित, आरे, दुग्ध कॉलनी, गोरेगाव (पूर्व), मुंबई-६५
१८) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, शास्त्रीनगर, अकोला.
१९) सहसंचालक लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला,मंत्रालयासमोर, मुंबई
२०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञयेता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ /२, मुंबई / नागपूर
२१) महालेखाकार( स्थानीय निकाय लेखापरिक्षा व लेखा ), प्रतिष्ठा भवन ,१०१ महषी कवे मार्ग, मुंबई-४०० ०२०
२२) नियोजन विभाग (कार्यासन - १४३१ / कार्यासन - १४४४), मंत्रालय, मुंबई - ३२
२३) वित्त विभाग (व्यय-१) /अर्थसंकल्प -१३
२४) सर्व सहसचिव /उपसचिव / अवर सचिव/ कक्ष अधिकारी, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
२५) निवडनस्ती (कार्यासन-४अे).